**महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील तरतूदीच्या अनुषंगाने अपील किंवा पुनरिक्षण/पुनर्विलोकन अर्ज करणाऱ्या व्यक्तीने आव्हानित आदेशांतर्गत शासनास देय रकमेच्या २५% रक्कम शासनास जमा करणे तसेच याप्रमाणे जमा केलेल्या रकमेपेक्षा शासनास अंतिमत: देय ठरलेली रक्कम कमी असेल, तर ज्यादा रक्कमेचा अपिलकर्त्यास / अर्जदारास परतावा करण्याबाबत कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१६/प्र.क्र.२४९ /ज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : ०१ मार्च, २०१७**

**वाचा:**

१. सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २७, दि. २२ ऑगस्ट, २०१६

**प्रस्तावना :-**

सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २७ दिनांक २२, ऑगस्ट, २०१६ रोजी शासन राजपत्र (असाधारण) यामध्ये प्रसिध्द करण्यात आला असून त्यानुसार महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम २५६ च्या पोटकलम (२) व पोट कलम (३) मध्ये परंतुके दाखल करण्यात आली आहेत.

उक्त नवीन परंतुकान्वये ज्या आदेशाविरुध्द अपील करण्यात आले असेल किंवा ज्या आदेशाविरुध्द पुनर्विलोकन किंवा पुनरिक्षण याकरीता अर्ज दाखल करण्यात आला असेल, त्या आदेशामध्ये शासनाला कोणत्याही रकमेचे प्रदान करणे अंतर्भूत असेल त्याबाबतीत अशा आव्हानित आदेशांतर्गत शासनाला देय असलेल्या रकमेच्या पंचवीस टक्के (२५%) रक्कम अपील करणाऱ्या किंवा यथास्थिती पुनरिक्षण/पुनर्विलोकन अर्ज दाखल करणाऱ्या व्यक्तीने शासन जमा केली नाही तर अशा आव्हानित आदेशाच्या अंमलबजावणीस स्थगिती देण्यात येणार नाही अशी तरतूद करण्यात आली आहे. उक्त तरतूदीप्रमाणे शासन जमा केलेली रक्कम ही अपीलामध्ये किंवा पुनरीक्षण/पुनर्विलोकन अर्जामध्ये दिलेल्या अंतिम आदेशानुसार शासनास अंतिमत: देय ठरलेल्या रकमेमधून समायोजित करण्याची आणि जर शासनास देय ठरलेली अंतिम रक्कम अपील / पुनरीक्षण किंवा पुनर्विलोकन अर्ज करणाऱ्या व्यक्तीने जमा केलेल्या रकमेपेक्षा कमी असेल तर राहिलेली ज्यादा रक्कम अपील करणाऱ्या, किंवा यथास्थिती, पुनरिक्षण /पुनर्विलोकन अर्ज करणाऱ्या व्यक्तीला **कोणत्याही व्याजाशिवाय** परत करण्यात येईल अशी तरतूद करण्यात आली आहे. या तरतूदीनुसार "***महसूल व जमा यांची शीर्षे***" यामध्ये अशी रक्कम अपीलकर्त्याकडून/अर्जदाराकडून जमा करण्याकरीता व नंतर अपीलकर्त्यास/अर्जदारास परत

करण्याकरीता नवीन महसूल शीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार, शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२७, दिनांक २२.८.२०१६ अन्वये ज्या आदेशाविरुध्द अपील करण्यात आले असेल किंवा ज्या आदेशाविरुध्द पुनर्विलोकन किंवा पुनरिक्षण याकरीता अर्ज दाखल करण्यात आला असेल, त्या आदेशामध्ये शासनाला कोणत्याही रकमेचे प्रदान करणे अंतर्भूत असेल त्याबाबतीत अशा आक्षेपित आदेशांतर्गत शासनाला देय असेल अशा रकमेच्या २५ टक्के रक्कम अशा अपील करणाऱ्या व्यक्तीने /अर्जदाराने जमा केली नाही तर, अशा आक्षेपित आदेशाच्या अंमलबजावणीस स्थगिती देण्यात येणार नाही, अशी तरतूद करण्यात आली असून अशी जमा करण्यात आलेली रक्कम अपीलामध्ये किंवा यथास्थिती पुनरिक्षण /पुनर्विलोकनामध्ये देण्यात आलेल्या अंतिम आदेशानुसार शासनास देय ठरलेल्या रकमेमधून समायोजित करण्याची आणि जर शासनास देय ठरलेली अंतिम रक्कम अपीलकर्त्याने किंवा यथास्थिती पुनरिक्षण/पुनर्विलोकन अर्ज करणाऱ्या व्यक्तीने जमा केलेल्या रकमेपेक्षा कमी असेल तर राहिलेली ज्यादा रक्कम अशा अपीलकर्त्यास किंवा यथास्थिती अर्जदारास **कोणत्याही व्याजाशिवाय** परत करण्यात येईल अशी तरतूद करण्यात आली आहे. उक्त तरतूदीनुसार अपील किंवा यथास्थिती पुनरीक्षण/पुनर्विलोकन अर्जात आक्षेपित आदेशांतर्गत शासनास देय रकमेच्या **२५% रक्कम शासनाकडे जमा करण्याकरीता** खाली नमूद केल्याप्रमाणे नवीन **"*महसूल शीर्ष*"** उघडण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

| इंग्रजी लेखाशीर्ष | मराठी लेखाशीर्ष |
|---|---|
| 0070-Other Administrative Services<br>01-Administration of Justice<br>102-Fines and Forfeitures<br>01- Fines and Forfeitures<br>(01) (09) Deposits in cases of Appeal/ Review/Revision under Maharashtra Land Revenue Code.<br>**Cross Reference Code-<u>0070084201</u>** | ००७०-इतर प्रशासनिक सेवा<br>०१- न्यायदान<br>१०२- दंड आणि जप्तीच्या रकमा<br>०१-दंड आणि जप्तीच्या रकमा<br>**(०१)(०९) महाराष्ट्र जमीन महसूल संहितेअंतर्गत अपील/ पुनर्विलोकन/पुनरीक्षण प्रकरणातील ठेवी.**<br>**संगणक संकेतांक क्रमांक:- <u>००७००८४२०१</u>** |

**०२. <u>उक्त जादा प्रदानाची रक्कम संबंधीतांना परत करण्याकरिता परतावा लेखाशीर्ष</u> :-**

अपिलकर्त्याने/अर्जदाराने स्थगिती आदेश मिळविण्याकामी वरीलप्रमाणे शासनाकडे जमा केलेली रक्कम ही अपील/पुनर्विलोकन/पुनरिक्षण या कार्यवाहीमध्ये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या अंतिम आदेशानुसार शासनास देय ठरलेल्या अंतिम रकमेपेक्षा जास्त असेल तर ज्यादा राहिलेली रक्कम संबंधित अपील कर्त्यास किंवा यथास्थिती पुनरीक्षण/पुनर्विलोकनासाठी अर्ज करणाऱ्या व्यक्तीस ***<u>"००७००७९८-वजा परतावे"</u>*** **या लेखाशीर्षातून** संबंधित अपीलीय प्राधिकारी किंवा यथास्थिती पुनरीक्षण/पुनर्विलोकन प्राधिकाऱ्याकडून देण्यात यावी.

०३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४३६/अर्थ-६/१६ दिनांक २८.१२.२०१६ व महालेखापाल, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि. /चा-१/म.व.वन वि. / युओआर-८८/२०१६-१७/१३८६ दिनांक ७.११.२०१६ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०१७०३०१११११५८६७१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manu Kumar Srivastava

Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2017.03.01 18:55:27 +05'30'

**मनु कुमार श्रीवास्तव**
**प्रधान सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी)**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व जिल्हाधिकारी,
८) सर्व मंत्रालयीन विभाग,
९) महालेखापाल महाराष्ट्र१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
१०) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) महसूल विभागातील सर्व कार्यासने
१४) निवडनस्ती (कार्यासन ज-१)